# महाराष्ट्र शासन

**क्र. औन्यामुं-०८२४/प्र.क्र.९०/काम-६**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १४ ऑगस्ट, २०२४

**विषय:** औद्योगिक व कामगार न्यायालय, भंडारा या कार्यालयासाठी शासकीय जागा हस्तगत झालेली असल्याने, सदर जागेमधून जाणारी उच्च दाबाची विदयुत वाहिनी स्थलांतरीत करण्याच्या अंदाजपत्रकास **मंजूरी देण्याबाबत.**

**वाचा:** प्रभारी प्रबंधक, औद्योगिक न्यायालय, महाराष्ट्र, मुंबई यांचे पत्र क्र. औन्यामुं/आस्था-२/ १७८१, दिनांक ३०/०७/२०२४.

**ज्ञापन :-**

प्रभारी प्रबंधक, औद्योगिक न्यायालय, महाराष्ट्र, मुंबई यांच्या संदर्भाधीन पत्राच्या अनुषंगाने कळविण्यात येते की, औद्योगिक व कामगार न्यायालय, भंडारा या कार्यालयासाठी शासकीय जागा हस्तगत झालेली असल्याने, सदर जागेमधून जाणारी उच्च दाबाची विद्युत वाहिनी स्थलांतरीत करण्याच्या अंदाजपत्रकास **येणाऱ्या** रु. ५,५२,६७४/- इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मंजूरी देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग "मागणी क्र. के-४, मुख्य लेखाशिर्ष "२२३०-कामगार व सेवायोजन-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना राज्यांतर्गत योजना -०१ कामगार-१०१ औदयोगिक संबंध (००)-(०७) - औद्योगिक लवाद व न्यायालये (२२३० १३१२) २७ लहान बांधकामे" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो चालू वर्षी सन २०२४-२५ करीता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर ज्ञापन वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग -१, उपविभाग पाच मधील नियम क्र. १३४(१) अन्वये प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार तसेच उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभागाने शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन कामासाठीच्या कार्यपध्दती अंतर्गत वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०८१६१०४९१५०११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

DEEPALI
UPENDRA JAPE

Digitally signed by DEEPALI UPENDRA JAPE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=735d6d81d9099a643dc5a1e7e261a6ea60ad4418817bd25d02db4654ea8c8e11, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F1EDA6DD54D9C1D002A33252AA96B6C559E22C914431F772457B39E98A5FCEAC, cn=DEEPALI UPENDRA JAPE
Date: 2024.08.16 11:04:15 +05'30'

**( दीपाली जपे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अध्यक्ष, औद्योगिक न्यायालय, महाराष्ट्र, मुंबई.
२) प्रबंधक, औद्योगिक न्यायालय, महाराष्ट्र, मुंबई.
३) महालेखापाल - १ (लेखापरीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा.
५) सदस्य, औद्योगिक न्यायालय, भंडारा.
६) निवड नस्ती (कामगार-६).